www.pudhari.com




# पुढारी

प्रचंड खपाचे एकमेव निःपक्ष व निर्भीड दैनिक

नाशिक

सोमवार, ६ फेब्रुवारी २०१७ | स्थापना वर्षे ७९ | नाशिक आवृत्ती वर्ष ३ रे | मुंबई, पुणे, औरंगाबाद, कोल्हापूर, सांगली, सातारा, ठाणे, रायगड, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, अहमदनगर,

एखादी गोष्ट करायची म्हणजे तिचे शास्त्रशुद्ध ज्ञान असायलाच हवे, असे तरुणाईला वाटते; मात्र हातात कला असेल तर यश दूर राहत नाही, याचा प्रत्यय त्र्यंबकेश्वर येथील युवा चित्रकार सिद्धार्थ धारणे याच्या प्रवासातून येतो. त्याविषयीचा हा लेख...




# .. तर यश दूर नाही

त्र्यंबकेश्वर येथील सिद्धार्थ धारणे हा युवक खरेतर संगणक अभियंता. त्याने चित्रकलेचे शास्त्रशुद्ध शिक्षण घेतलेले नाही; पण उत्तम चित्रकार म्हणून त्याची आज ओळख निर्माण झाली आहे. त्याचे वडील तथा प्रसिद्ध छायाचित्रकार रवींद्र व आई ज्योती या दोघांना कलेची नितांत आवड. त्यांनी सिद्धार्थला लहानपणापासूनच प्रोत्साहन दिले अन् त्याच्यातील चित्रकार घडत गेला.



सिद्धार्थच्या प्रवासाची सुरुवात २००५ मध्ये झाली. प्राथमिक शिक्षण घेत असताना त्याला अखिल भारतीय जलसाहित्य संमेलनात आयोजित चित्रकला स्पर्धेत राष्ट्रीय स्तरावर प्रथम पारितोषिक मिळाले. माध्यमिक शिक्षण सुरू असताना राज्यस्तरीय चित्रकला स्पर्धेत २००७ व २००८ अशी सलग दोन वर्षे त्याला पारितोषिके मिळाली. यानंतर सिद्धार्थने कधीच मागे वळून पाहिले नाही.

व्यावसायिक चित्रकार म्हणून त्याचा प्रवास सुरू झाला २०१४ मध्ये. नाशिक येथील सुला विनयार्ड येथे आयोजित एका चित्रप्रदर्शनात त्याने सहभाग घेतला. तेव्हापासून आतापर्यंत त्याची आठ व्यावसायिक चित्रप्रदर्शने झाली. पैकी चार प्रदर्शने सोलो (वैयक्तिक) होती. या प्रदर्शनांच्या माध्यमातून सिद्धार्थला अनेक नामवंत व्यक्तिमत्त्वांना भेटण्याची संधी लाभली. ज्येष्ठ गायक व संगीतकार श्रीधर फडके, डॉ. सलील कुलकर्णी, इन्फोसिसचे उपाध्यक्ष सी. एन. रघुपती यांनी चित्रप्रदर्शनांना भेटी दिल्या. 'नमो बुद्धाय', 'माउली' या शीर्षकांची अनेक प्रसिद्ध चित्रे समीक्षकांकडून नावाजली गेली.



'द लॉस्ट रिव्हर' हे त्याचे १९५० सालच्या त्र्यंबकेश्वर येथील मेनरोडवरून वाहणाऱ्या गोदावरी नदीचे चित्र असेच गाजले. गोदावरी स्वच्छता आंदोलन मध्यंतरी जोरात होते. हे प्रकरण हरित लवादात पोहोचले होते. तेव्हा सिद्धार्थचे हे चित्र अनेक वृत्तपत्रे व वृत्तवाहिन्यांवर दाखवण्यात आले. एका प्रदर्शनात हे चित्र ठेवण्यात आले असता, प्रदर्शन सुरू झाल्यावर काही क्षणांतच एका नामांकित वास्तुविशारदाने ते खरेदी केले. ते या चित्राचा अनेक दिवसांपासून शोध घेत होते.

सिद्धार्थला अनेक पुरस्कारांनी गौरविण्यात आले आहे. त्र्यंबकेश्वर येथील प्रतिष्ठेच्या 'गंगा गोदावरी' पुरस्काराने त्याला दोन वेळा सन्मानित करण्यात आले. त्र्यंबकेश्वर नगरपालिकेने 'त्र्यंबकेश्वर भूषण' हा पुरस्कार देऊन त्याचा गौरव केला. सिद्धार्थची स्वतःची वेगळी शैली आहे. त्यांच्या चित्रमध्ये पारंपरिक भारतीय व आधुनिक चित्रशैलीचे सुंदर मिश्रण पाहायला मिळते. अॅक्रेलिक, ऑइल, जलरंग, चारकोल, पेस्टल अशी अनेक माध्यमे तो हाताळतो. अॅक्रेलिक व जलरंग ही त्याची आवडीची माध्यमे. निसर्ग, प्राणी-पक्षी, जनजीवन, समाजजीवन, लोककला, व्यक्तिचित्र असे अनेक विषय त्याच्या कुंचल्यातून अवतरतात. अॅबस्ट्रॅक्ट (आभासी) व रिॲलिस्टिक (वास्तवदर्शी) अशा दोन्ही स्वरूपांत त्याची चित्रे पाहायला मिळतात. भारतीय पुराणावर आधारित 'द रिलेशन बिटवीन मॅन ॲण्ड गॉड' ही त्याची चित्रमालिकाही गाजली.

■ त्र्यंबकेश्वरजवळ पेगलवाडी येथे राहत्या घरी त्याने स्टुडिओ व आर्ट गॅलरी सुरू केली आहे. सिद्धार्थ म्हणतो, स्वतःची वेगळी ओळख निर्माण होते, तेव्हा खूप छान वाटते. खूप लोक आपल्याला ओळखतात, फॉलो करतात. पण सर्वांत चांगले तेव्हा वाटते, जेव्हा आपण एखादी कलाकृती साकारतो व लोकांना ती भावते. त्यासारखा दुसरा आनंद नसतो. यातून मला एक गोष्ट समजली की, यश मिळवणे एक वेळ सोपे; पण ते सतत मिळवत राहणे खूप अवघड असते आणि ते टिकवून ठेवणे तर त्याहून अवघड असते!

प्रतिनिधी

The Daily Pudhari Monday, 6 February 2017